अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या वस्तीचा विकास करणे (ग्रामिण) (पूर्वीचे नाव दलितवस्ती सुधार योजना) या योजनेंतर्गत सन २०१३-१४ ते २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता दलित वस्त्यांमध्ये सौर पथदिवे लावण्याबाबतचे आदेश रद्द करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन
### सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः दवसु-२०१४/प्र.क्र.४/अजाक-१

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
तारीख: १२ मे,२०१५

**वाचा**

१) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,क्रमांक :-दवसु-२०११/ प्र.क्र.४४२/अजाक,दिनांक ०५.१२.२०११
२) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,क्रमांक :-दवसु-२०११/ प्र.क्र.४४२/अजाक-१,दिनांक ३१.१२.२०११
३) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,क्रमांक :-दवसु-२०११/ प्र.क्र.४४२/अजाक-१,दिनांक ०२.०७.२०१२
४) आयुक्त,समाजकल्याण,पुणे यांचे क्र.सकआ/मावक/अजानव/सौरदिवे/२०१३-१४/का-१२/६६,दि.१६.०१.२०१४
५) शासनाचा समक्रमांकाचा दिनांक ३१.०१.२०१४ चा शासन निर्णय.
६) शासनाचे समक्रमांकाचे दिनांक ०१.०७.२०१४ चे पत्र.

## शासन निर्णय

अनुसूचित जातीच्या समाजाचे लोक समुहाने गावाच्या परिसिमेत वास्तव्य करीत राहतात. तसेच ब-याचदा अनुसूचित जातींपैकी उपजाती व जातीनिहाय घरे वेगवेगळया समुहाने एकत्रित वास्तव्य करुन राहतात व अशाप्रकारे वास्तव्य करुन असलेल्या सर्व जाती/उपजातींच्या समुहास दलित वस्ती असे संबोधण्यात येते. या वस्त्यांमध्ये मुलभूत सोयीसुविधा पुरवून तेथील लोकांचे जीवनमान जीवनमान उंचावण्यासाठी सन १९७४ पासून दलित वस्ती सुधार योजनेची अंमलबजावणी करण्यात येत आहे. सदर योजनेंतर्गत दलित वस्त्यांमध्ये अंतर्गत रस्ते,नाली बांधणे, पाणीपुरवठा,पाण्याचा हौद,समाजमंदिर रस्त्यावरील विद्युत पुरवठा,शौचालये इ.गरजा विचारात घेऊन विकास कामांना प्रशासकीय मंजूरी दिली जाते.

सबब, शासनाच्या संदर्भिय दिनांक ३०.०१.२०१४ च्या आदेशान्वये या योजनेअंतर्गत करावयाच्या विद्युतीकरणामध्ये सौर उर्जेच्या पथदिव्यांचा वापर करण्यासाठी शासनस्तरावरुन सन २०१३-१४ ते २०१६-१७ या वर्षाच्या कालावधीसाठी दरकरारावर नोंदविण्यात आलेल्या पुरवठादाराकडून वापर करण्यासाठी मंजूरी प्रदान करण्यात आली आहे.

सदरील दिनांक ३०.०१.२०१४ चे आदेश रद्द करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१३१२०५१५०९२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Narendra Murlidhar Patil

Digitally signed by Narendra Murlidhar Patil
DN: CN = Narendra Murlidhar Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.05.13 17:25:19 +05'30'

(न.मु.पाटील)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) आयुक्त,समाजकल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे,
२) महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेय/लेखा परिक्षा) महाराष्ट्र ½,मुंबई/नागपूर,
३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,
४) सहसचिव,मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,मंत्रालय,मुंबई,
५) सहआयुक्त,समाजकल्याण (अनुसूचित जाती उपयोजना) महाराष्ट्र राज्य,पुणे,
६) वित्त विभाग/नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई,
७) सर्व प्रादेशिक उपायुक्त,समाजकल्याण विभाग,
८) सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी,जिल्हा परिषद,
९) मा.मंत्री,सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई,
१०) मा.राज्यमंत्री,सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई,
११) सहसचिव/कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/विघयो),सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय,मुंबई,
१२) निवडनस्ती,अजाक-१.